महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेसाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्र. आरएलवाय २०१५/प्र. क्र. १३/परि-५

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, दुसरा मजला, मुंबई- ३२,
दि. २४ जानेवारी २०१७

वाचा:- १) मा. मुख्यमंत्री व मा. रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.८ जानेवारी २०१५ रोजी झालेली बैठकीचे क्र. आरएलवाय-२०१५/प्र. क्र. १/रेल्वेडेस्क, दि.१४.१.२०१५ रोजी निर्गमीत केलेले इतिवृत्त.
२) राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान दि. २६.६.२०१५ रोजीचा सामंजस्य करार.
३) विभागाचा समक्रमांकाचा दि.८.११.२०१६ रोजीचा शासन निर्णय.
४) मंत्रिमंडळ सचिव यांनी दि.२७.१२.२०१६ च्या पत्रान्वये कळविलेला मा. मंत्रिमंडळाचा दि.१५.१२.२०१६ रोजीचा निर्णय.

प्रस्तावना:-

राज्यातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी, रेल्वे प्रकल्पांचा विकास, अंमलबजावणी आणि व्यवहार्यता तपासणे, प्रकल्प क्षमतेत वाढ करणे, प्रकल्प विहीत कालावधीमध्ये पूर्ण व्हावेत तसेच भुसंपादन झाल्यानंतर प्रकल्पबाधितांना मदत व पुनर्वसन त्वरेने होणेसाठी राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे संयुक्त भागीदारीतून महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेसाठी मा.मुख्यमंत्री व मा.रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.८.१.२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये तत्वत: मंजूरी दिली होती. त्यानुसार महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) ही विशेष उपयोजिता वाहन (SPV - Special Purpose Vehicle) स्थापन करणेसाठी राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान दि.२८.६.२०१५ रोजी सामंजस्य करार (Memorandum of Understanding) करणेत आला आहे. तसेच शासनाच्या आर्थिक सहभागातून अंमलात आणावयाचे विविध प्रकल्प विशेष उपयोजिता वाहनाकडे (Special Purpose Vehicle) हस्तांतरीत करण्यासही शासनाने तत्वत: मान्यता दिली आहे.

२. मा. मंत्रिमंडळाने दि.१५.१२.२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये विषय क्र. १३ नुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत:-

१) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेस मान्यता देण्यात यावी.

२) राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान संयुक्त उपक्रम करार करण्यास मान्यता देण्यात यावी.

३) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीचे नोंदणीकरीता भागधारक करारनामा, संघटनेचा लेख च्या प्रारुपास मान्यता देण्यात यावी.

४) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीचे प्रारंभिक अधिकृत भागभांडवलातील राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु.५०.०० कोटी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात यावी. आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये त्या अनुषंगाने नियतव्यय उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात यावी.

**<u>शासन निर्णय:-</u>**

मा. मंत्रिमंडळाने दि.१५.१२.२०१६ रोजीचे बैठकीतील विषय क्रमांक १३ नुसार दिलेल्या मान्यतेनुसार महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेस प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे, आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीचे प्रारंभिक अधिकृत भागभांडवलातील राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु.५०.०० कोटी नियतव्यय उपलब्ध करुन देण्यासही मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्र. ३ वरील दि.८.११.२०१६ रोजीचा शासन निर्णय याद्वारे अधिक्रमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२४१५२८०८३६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.01.24 15:29:55 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, १/२ (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली
३) महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई/दक्षिण मध्य रेल्वे,सिकंदराबाद
४) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, छत्रपती शिवाजी टर्मिनस, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) बीयुडी-१,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) वित्त विभाग, व्यय-८, बीयुडी११, मंत्रालय, मुंबई-३२
९) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई-३२
१०) निवडनस्ती/परि-५

**प्रत, (माहितीसाठी अग्रेषित)**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा. मुख्यसचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा. प्रधानसचिव (परिवहन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२